यवतमाळ जिल्ह्यातील उमरखेड व पुसद तालुक्यातील ग्रामीण मार्ग रस्त्याची इतर जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः रवियो-२०१९/प्र.क्र.११२/नियोजन-२**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक- ०९ मार्च, २०२२.

**पहावे** :- १) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, अमरावती यांचे पत्र जा.क्र.का-२(२)/ दर्जोन्नती/ २०१८/२५६६, दि.२७/०६/२०१९.

**प्रस्तावना :-**

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, अमरावती यांनी संदर्भाधिन पत्रान्वये यवतमाळ जिल्ह्यातील उमरखेड व पुसद तालुक्यातील ग्रामीण मार्ग रस्ते, इतर जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करणेबाबतचा प्रस्ताव शासनास सादर केलेला आहे. तसेच जिल्हा परिषद, यवतमाळ यांनी सदर रस्ता दर्जोन्नत करणेबाबत मागणी केलेली आहे.

सदर रस्त्यावरील वाहतुक वर्दळ व गावांची संख्या, लोकसंख्या, रस्त्याचा होणारा वापर तसेच जिल्हा परिषद, यवतमाळ यांचा ठराव विचारात घेता सदर रस्ता इतर जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय** :-

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, अमरावती यांचा प्रस्ताव व जिल्हा परिषद, यवतमाळ यांचा ठराव विचारात घेऊन यवतमाळ जिल्ह्यातील उमरखेड व पुसद तालुक्यातील खालील रस्ता दर्जोन्नत करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | प्रस्तावित रस्त्याचे नांव | रस्त्याचा क्रमांक | साखळी क्रमांक व लांबी | दर्जोन्नत करावयाची एकूण लांबी (कि.मी.) | दर्जोन्नती नंतरचा क्रमांक |
|---|---|---|---|---|---|
| १. | पिंपळदरी आडद धनज मोहदरी धरमवाडी ते प्रजिमा ३८ ला जोडणारा रस्ता | ग्रामीण मार्ग-१ | ०/०० ते ४/१०० ४.१०० कि.मी. | १२.८०० कि.मी. | इतर जिल्हा मार्ग-२४७ |
| | | ग्रामीण मार्ग-२ | ०/०० ते २/९०० २.९०० कि.मी. | | |
| | | ग्रामीण मार्ग-३ | ०/०० ते १/८०० १.८०० कि.मी. | | |
| | | ग्रामीण मार्ग -२२५ | ०/०० ते २/०० २.०० कि.मी. | | |
| | | ग्रामीण मार्ग -१४४ | ०/०० ते २/०० २.०० कि.मी. | | |
| | | **एकूण** | | **१२.८०० कि.मी.** | |

परिणामी, रस्ते विकास योजना २००१-२०२१ मधील यवतमाळ जिल्ह्यातील **इतर जिल्हा मार्ग** दर्जाच्या रस्त्यांच्या एकूण लांबीत **१२.८०० कि.मी.** ने वाढ होवून एकूण लांबी (२६२३.८००+१२.८००) म्हणजेच **२६३६.६०० कि.मी.** इतकी व ग्रामीण मार्ग रस्त्याच्या लांबीत **१२.८०० कि.मी.** ने घट होवून एकूण लांबी (६८२४.६२०-१२.८००) म्हणजेच **६८११.८२० कि.मी.** इतकी होईल.

हा शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२२०३१११५५७२७६८१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

GANPAT SANDIPAN KACHARE

Digitally signed by GANPAT SANDIPAN KACHARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3021bf955fefd71ffad5dd7c97769147f19aca6383a12fed6cff4849d78e224a, pseudonym=44879507A55BADCE1C62B2D52FC25354CE085DFF, serialNumber=B5B30AEBA818C77E43E7B8BA4BCA0E9F0D137FEAB0BBCB16CACF2D44087E8A76, cn=GANPAT SANDIPAN KACHARE
Date: 2022.03.11 15:58:51 +05'30'

**( ग. सं. कचरे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, अमरावती.
२) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, अमरावती. (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)
३) जिल्हाधिकारी,यवतमाळ.
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, यवतमाळ.
५) अधिक्षक अभियंता, सा.बां.मंडळ, यवतमाळ (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा.)
६) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, यवतमाळ.
७) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.
८) रस्ते विकास योजना २००१-२०२१ ची नस्ती.
९) निवडनस्ती.